विभागीय वन अधिकारी, वनसंपत्ती सर्वेक्षण घटक, कार्य आयोजना, अमरावती या पदाचा आहरण संवितरण सांकेतांक क्रमांक (DDO) ६१०१००११५० बंद करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
महसूल व वन विभाग,
शासन निर्णय क्रमांक : एफडीएम २०१९/प्र.क्र.१०४/फ-२
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- ९ जानेवारी, २०२०

संदर्भ :- १) वित्त विभाग, शासन निर्णय, क्रमांक-मकोनि-१०००/प्र.क्र.४४/०५,कोषा-प्र.५ दि. ०४.०१.२००६.
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), नागपूर यांच्या कार्यालयाचे पत्र क्र.कक्ष-२(१)/असं/प्र.क्र.१७ (१९-२०)/३७१/१९-२०, दि.०३.१२.२०१९
३) उप वनसंरक्षक, कार्य आयोजना, अमरावती यांच्या कार्यालयाचे पत्र क्र.कक्ष-५/आस्था/ प्र.क्र.४८४/(एक)/डिडिओ/४०६/२०१९-२०, दि.१६.११.२०१९

प्रस्तावना -

शासनाच्या वन विभागाच्या क्षेत्रिय कार्यालयातील कर्मचाऱ्यांची वेतन व भत्यांची देयके फेब्रुवारी-२००६ पासून इतर विभागाच्या कर्मचाऱ्यांप्रमाणेच कोषागारातून पारित करण्याबाबत वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि.०४.०१.२००६ च्या शासन निर्णयान्वये निर्णय घेण्यात आला आहे. यानुसार महाराष्ट्र कोषागार नियम १९६८ खंड-१ मधील नियम १३ नुसार व नियम १५(३) नुसार विभागातील आहरण व संवितरण अधिकाऱ्यांची यादी महालेखापाल कार्यालयाकडे पाठविण्यात येते. यानुसार वेळोवेळी निर्गमीत केलेल्या शासन निर्णयानुसार विभागातील आहरण व संवितरण आधिकाऱ्यांच्या याद्या प्रसिध्द करण्यात आल्या आहेत.

२. मेळघाट व्याघ्र प्रकल्पाची पुनर्रचना आणी एकछत्री नियंत्रणामध्ये मेळघाट वन्यजीव विभागाचे व्यवस्थापनाकरीता उप वनसंरक्षक, कार्य आयोजना, अमरावती या कार्यालयातील विभागीय वन अधिकारी, वनसंपत्ती सर्वेक्षण घटक, कार्य आयोजन, अमरावती हे पद मेळघाट व्याघ्र प्रकल्पाकडे वर्ग झाले असून त्याचे मुख्यालय परतवाडा येथे ठेवण्यात आले आहे. विभागीय वन अधिकारी, वनसंपत्ती सर्वेक्षण घटक, कार्य आयोजन, अमरावती यांचा आहरण व संवितरण अधिकारी (DDO) क्र. ६१०१००११५० असा आहे. सदरचे पद वर्ग झाल्याने त्यांचे कार्यालय सुध्दा बंद करण्यात आले आहे. त्यामुळे त्यांच्या अधिनस्त कार्यरत असणा-या अधिकारी व कर्मचारी यांना उप वनसंरक्षक, कार्य आयोजना, अमरावती यांच्या आहरण व संवितरण क्र.६१०१००१०९४ ला जोडण्यात आले असून त्यांचे वेतन व भत्ते अदा करण्याची कार्यवाही सुध्दा सुरु करण्यात आलेली आहे. त्यामुळे विभागीय वन अधिकारी, वनसंपत्ती सर्वेक्षण घटक, कार्य आयोजना, अमरावती या पदाचा आहरण संवितरण सांकेतांक क्रमांक ६१०१००११५० बंद करण्याबाबतचा प्रस्ताव प्रस्ताव प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास ) यांनी संदर्भ क्र.२ येथील पत्रान्वये सादर केला आहे.

३. त्या अनुषंगाने विभागीय वन अधिकारी, वनसंपत्ती सर्वेक्षण घटक, कार्य आयोजना, अमरावती या पदाचा आहरण संवितरण सांकेतांक क्रमांक ६१०१००११५० बंद करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास ) यांच्या संदर्भ क्र.२ येथील पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावास अनुसरुन विभागीय वन अधिकारी, वनसंपत्ती सर्वेक्षण घटक, कार्य आयोजना, अमरावती या पदाचा आहरण संवितरण सांकेतांक क्रमांक ६१०१००११५० या शासन निर्णयान्वये बंद करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | पदनाम आणि आहरण व संवितरण अधिकारी | आहरण व संवितरण क्रमांक |
|---|---|---|
| १ | विभागीय वन अधिकारी, वनसंपत्ती सर्वेक्षण घटक, कार्य आयोजना, अमरावती | ६१०१००११५० |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असुन त्याचा संकेतांक २०२००१०९१११८३७५९१९ असा आहे.हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Atul Ashok Kode

Digitally signed by Atul Ashok Kode
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a12403ed93b05957cb29b7e95265d3ac52d366233b80405514f23a879132aeec, serialNumber=f0d5ee4c99cc9cbfa8761b3ddc7bd6650bad33302f33a35400ad5aad2291371a, cn=Atul Ashok Kode
Date: 2020.01.09 11:04:41 +05'30'

**( अतुल कोदे )**
**सह सचिव**
**महसूल व वन विभाग**

**प्रति -**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), नागपूर.
३. मुख्य वनसंरक्षक (कार्य अयोजना)-पूर्व), नागपूर.
४. उप वनसंरक्षक (कार्य आयोजना), अमरावती.
५. महालेखापाल (लेखा परीक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य-१/२, मुंबई/ नागपूर.
(त्यांना विनंती करण्यात येते कि, महाराष्ट्र कोषागार नियम १९६८ खंड-१ मधील नियम १५(२) व १५ (३) नुसार उपरोक्त अधिकाऱ्यास प्राधिकृत करण्याची पुढील कार्यवाही करण्यात करावी.)
६. संचालक, लेखा व कोषागार, संचालनालय, मुंबई.
७. वरीष्ठ लेखा कोषागार अधिकारी, नागपूर / मुंबई.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती.
९. सहसंचालक, (तांत्रिक) लेखा व कोषागार, मुंबई.
१०. वित्त विभाग, कार्यासन कोषा. प्र-५, मंत्रालय, मुंबई.
११. निवड नस्ती (फ-२), महसूल व वन विभाग.